मराठी भाषा संवर्धन पंधरवड्याच्या निमित्ताने विविध कार्यक्रमांचे आयोजन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः मभापं-२०१८/प्र.क्र.१४६/भाषा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १२ डिसेंबर, २०१८

वाचा:- मराठी भाषा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक - मभापं-२०१८/प्र.क्र.१४२/भाषा-२, दि.०४.१२.२०१८

## शासन परिपत्रक

मराठी भाषेचे वैभव जपण्यासाठी व भाषेच्या संवर्धनासाठी दिनांक १ जानेवारी ते १५ जानेवारी या कालावधीत “मराठी भाषा संवर्धन पंधरवडा”साजरा करण्याबाबत दि.४.१२.२०१८ च्या परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत. मराठी भाषा संवर्धन पंधरवड्याच्या अनुषंगाने मराठी भाषा विभागामार्फत मंत्रालयीन विभागातील अधिकारी/कर्मचारी यांच्यासाठी खालील स्पर्धा आयोजित करण्यात येत आहेत.

**१) मराठी भाषेसंबंधी घोषवाक्य स्पर्धा :-**

मराठी ही राज्याची राजभाषा असून तिच्या प्रचार, प्रसार व संवर्धनासाठी घोषवाक्ये तयार करावयाची आहेत. त्यासाठी मराठी भाषा संवर्धन पंधरवड्यानिमित्त मराठी भाषेसंबंधी घोषवाक्ये तयार करण्याची स्पर्धा आयोजित करण्यात येत आहे. उदा. "मी मराठीतच बोलणार, आपल्या मातीचा मान राखणार।", "सार्वजनिक फलक, सार्वजनिक सेवांमध्ये मराठीच्या वापराबाबत आग्रह धरा." अशाप्रकारची मराठी भाषेचा वापर वाढेल अशी १-२ ओळींची घोषवाक्ये बनविणे अपेक्षित आहे.

जनमानसात प्रभावी ठरणारी घोषवाक्ये निवडण्यात येणार असून त्यांचा वापर भविष्यात मराठी भाषेच्या प्रचार, प्रसारासाठी करण्यात येणार आहे. प्रत्येक चांगल्या घोषवाक्यासाठी विजेत्याला त्याच्या आवडीचे मराठी भाषेतील पुस्तक घेण्यासाठी रू.५००/- इतक्या किंमतीचे प्रमाणक (व्हाऊचर) बक्षीस म्हणून देण्यात येईल. मंत्रालयात दि. ३ जानेवारी ते ५ जानेवारी या कालावधीत त्रिमूर्ती प्रांगणांत भरणाऱ्या ग्रंथप्रदर्शनातील कोणत्याही पुस्तकालयात सदर प्रमाणक दाखवून बक्षीसाची पुस्तके घेता येतील.

सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी इच्छुकांनी आपले नाव, पदनाम, विभाग, भ्रमणध्वनी व घोषवाक्ये इ. माहिती पुढील ई-मेलवर दि.२५.१२.२०१८ पर्यत पाठवावी.

email- ashok.bharate@nic.in

**२) निबंधस्पर्धा -**

मराठी भाषेच्या संवर्धनासाठी मराठीतून बोलण्यासोबतच मराठीतून वाचन, लेखनाचेही तितकेच महत्व आहे. कोणताही मनुष्य त्याचे विचार लेखनाव्दारे जास्त चांगल्या प्रकारे व्यक्त करू शकतो. आताच्या संगणकाच्या युगात लेखनाची गरज कमी झालेली असली तरी विचार व्यक्त करण्यासाठी लेखन हे प्रभावी

माध्यम आहे, ही बाब लक्षात घेऊन पुढील विषयासंदर्भात मराठी भाषा संवर्धन पंधरवड्यात निबंधस्पर्धा आयोजित करण्यात येत आहे. यापैकी कोणत्याही एका विषयावर ५०० शब्दात निबंध लिहावयाचा आहे.

१) मराठी भाषा जतन व संवर्धन याकरिता नाविन्यपूर्ण उपक्रम
२) आधुनिक तंत्रज्ञान व मराठी भाषा
३) मराठी ज्ञानभाषा आव्हाने व उपाय

सदर स्पर्धेत पहिल्या ३ क्रमांकांना अनुक्रमे रू.२०००/-, १५००/- व १०००/- व उत्तेजनार्थ रू.५००/- असे बक्षीस देण्यात येईल. सदर स्पर्धेत सहभागी होण्यासाठी इच्छुक असलेल्या अधिकारी/कर्मचा-यांनी आपले नाव, पदनाम, विभाग, भ्रमणध्वनी व निबंध इत्यादी तपशील पुढील ई-मेलवर दि.२५.१२.२०१८ पर्यत पाठवावा.

email- nanda.raut@nic.in

सर्व मंत्रालयीन विभागातील अधिकारी/कर्मचारी यांना घोषवाक्य स्पर्धा व निबंध स्पर्धेत सहभागी होण्याचे आवाहन करण्यात येत आहे.

याशिवाय मराठी भाषेच्या प्रचार, प्रसारासंदर्भात पुढीलप्रमाणे कार्यक्रम आयोजित केले आहेत. त्यास मोठ्या संख्येने उपस्थित रहावे.

**१) "चालता-बोलता"- प्रश्नमंजुषा कार्यक्रम:-**

मंत्रालयातील त्रिमूर्ती प्रांगणांत गुरूवार दि.०३.०१.२०१९ रोजी सकाळी १० ते सायंकाळी ५ या वेळेत मराठी भाषेतील म्हणी, वाक्प्रचार, इंग्रजी शब्दांना पर्यायी मराठी शब्द तसेच ज्येष्ठ साहित्यिक स्व.पु.ल.देशपांडे, स्व.ग.दि.माडगुळकर तसेच स्व.सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त त्यांच्यावर आधारीत प्रश्न तसेच मराठी साहित्य/साहित्यिक या संदर्भातील प्रश्नमंजुषेचा कार्यक्रम आयोजित केला आहे. या स्पर्धात्मक कार्यक्रमात सहभागी होऊन जो बरोबर उत्तर देईल त्यास लगेच बक्षीस दिले जाईल.

**२) मराठी भाषा व तंत्रज्ञान या विषयावर व्याख्यान :-**

श्री.विनय सामंत, कार्यकारी संचालक, अनन्या मल्टिटेक प्रा.लि. यांचे दि.०३.०१.२०१९ रोजी सायंकाळी ५ ते ६ या कालावधीत खालील मुद्यावर मंत्रालयातील त्रिमूर्ती प्रांगणात व्याख्यान आयोजित करण्यात आले आहे-

१) मराठी भाषा आणि त्यानुसार उपलब्ध महत्वाची टूल्स: फॉन्ट, स्पेलिंग इ.,
२) महाजालावरील चित्तवेधक मराठी साईट्स
३) मराठी साईट कशी बनवावी?
४) उपयुक्त उपकरणे व पद्धती (टूल्स व सीएमएस सिस्टिम)
५) काही अत्यावश्यक मराठी साईट्स/सुविधा ज्या सध्या उपलब्ध नाहीत परंतु लवकर व्हायला हव्यात.

**३) मुलाखतीचा कार्यक्रम :- "मराठीचा आग्रह का आणि कशासाठी"**

मराठी भाषेच्या प्रचार, प्रसारासाठी योगदान देणाऱ्या खालील व्यक्तींच्या मुलाखतीचा कार्यक्रम शुक्रवार, दि.०४.०१.२०१९ रोजी सायंकाळी ४.३० ते ६.३० या कालावधीत मंत्रालयातील त्रिमूर्ती प्रांगणात आयोजित करण्यात आला आहे.

१) श्री.कौशल इनामदार, प्रसिद्ध संगीत दिग्दर्शक
२) श्रीम.चिन्मयी सुमित, अभिनेत्री
३) मुलाखतकार- श्रीमती मीनल जोगळेकर, वरिष्ठ सहायक संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

**४) अभिवाचन, काव्य, गीत-संगीतावर आधारीत कार्यक्रम :-**

मंत्रालयातील गुणवंत कलाकार कर्मचाऱ्यांनी एकत्र येऊन स्थापन केलेल्या संकल्प कलामंचाचे कलाकार ज्येष्ठ साहित्यिक स्व.पु.ल.देशपांडे, स्व.ग.दि.माडगुळकर तसेच स्व.सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्त त्यांच्यावर आधारित कविता वाचन, अभिवाचन व गीत-संगीताचा कार्यक्रम सादर करणार आहेत. सदर कार्यक्रम शनिवार, दि.०५.०१.२०१९ रोजी सायंकाळी ४:३० ते ६.३० असा असून सर्वांनी कार्यक्रमास आवर्जून उपस्थित रहावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२१२१५१२३६९७३३ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajashri Uday Bapat

Digitally signed by Rajashri Uday Bapat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Marathi Language Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, cn=Rajashri Uday Bapat
Date: 2018.12.14 11:47:53 +05'30'

**( राजश्री बापट )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
३) मा.मुख्य सचिव / अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
४) महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७) सर्व मंत्रालयीन विभाग यांना विनंती करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांनी त्यांच्या विभागातील सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणावे.
८) निवडनस्ती (भाषा-२).